**१५ व्या केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील दशलक्षी शहरांच्या (Million Plus Cities) गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरिता हवेच्या दर्जामध्ये सुधारणा करण्यासाठी (Air Quality Improvement) प्राप्त अनुदानाचे वितरण व विनियोगाबाबतची कार्यपध्दती निश्चित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.एफएफसी २०२१/प्र.क्र.५५/नवि-४**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ८ डिसेंबर,२०२१.

**वाचा :-**

शासन निर्णय, नगर विकास विभाग,समक्रमांक दिनांक १४ जुलै,२०२१.

**प्रस्तावना** :-

१५ व्या वित्त आयोगाअंतर्गत दशलक्षी शहरांच्या (Million Plus Cities) गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरिता हवेच्या दर्जामध्ये सुधारणा (Air Quality Improvement) या प्रयोजनासाठीच्या अनुदानाच्या वितरणाची व विनियोगाबाबतची कार्यपध्दती वाचा येथील दिनांक १४ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेली आहे. सदर वितरीत अनुदानाच्या बाबतीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१५ व्या वित्त आयोगाअंतर्गत **दशलक्षी शहरांच्या (Million Plus Cities)** गटातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकरिता **हवेच्या दर्जामध्ये सुधारणा (Air Quality Improvement)** या प्रयोजनासाठीच्या अनुदानाच्या बाबतीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत खालील कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहे

१. **महानगरपालिका :-** १५ व्या वित्त आयोगाअंतर्गत (Million Plus Cities) दशलक्षी शहरांच्या गटातील **हवेच्या दर्जामध्ये सुधारणा (Air Quality Improvement)** या प्रयोजनासाठीच्या अनुदानातून घेण्यात येणाऱ्या कामांच्या प्रस्तांवाना प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार महानगरपालिकांच्या बाबतीत संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्त यांना असतील.

२. **नगरपरिषदा :-**

i) १५ व्या वित्त आयोगाअंतर्गत (Million Plus Cities) दशलक्षी शहरांच्या गटातील **हवेच्या दर्जामध्ये सुधारणा (Air Quality Improvement)** या प्रयोजनासाठीच्या अनुदानातून घेण्यात येणाऱ्या कामांच्या प्रस्तांवाना प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार ‘अ’ वर्ग नगर परिषदेच्या बाबतीत रु.३० लाख, ‘ब’ वर्ग नगर परिषदेच्या बाबतीत रु.२० लाख व ‘क’ वर्ग नगर परिषदेच्या बाबतीत रु.१० लाख या मर्यादेत संबंधित नगर परिषदेच्या मुख्याधिकाऱ्यांना असतील.

ii) या व्यतीरिक्त सर्व कामांच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना असतील..

३. **कटकमंडळे :-** १५ व्या वित्त आयोगाअंतर्गत (Million Plus Cities) दशलक्षी शहरांच्या गटातील **हवेच्या दर्जामध्ये सुधारणा** (Air Quality Improvement) या प्रयोजनासाठीच्या अनुदानातून घेण्यात येणाऱ्या कामांच्या प्रस्तांवाना प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार कटकमंडळांच्या बाबतीत संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांना असतील.

४. उपरोक्त (१),(२) व (३) येथील संबंधीत अधिकाऱ्यांनी सदर प्रशासकीय मंजुरीचे अधिकार **हवेच्या दर्जामध्ये सुधारणा (Air Quality Improvement) घटकासाठी १५ व्या वित्त आयोगाच्या मार्गदर्शक सुचना,** केंद्रीय पर्यावरण,वन व वातावरणीय दाब बदल मंत्रालय, केंद्रीय प्रदूषण नियंत्रण मंडळ, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ यांच्याकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या सुचना/ आदेशांचे पालन करुन व त्यांच्या अधिनतेने वापरावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०८१५३५०६६५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2021.12.08 15:41:09 +05'30'

**(पां.जो.जाधव)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव
२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्राण मंडळ, मुंबई
७) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
८) महालेखापाल कार्यालय, (लेखापरीक्षा)) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९) महालेखापाल कार्यालय,) (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१०) संचालक, नगर रचना, पुणे
११) अग्निशमन सल्लागार, राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, कोळे कल्याण, मुंबई,
१२) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व कटकमंडळे
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) प्रधा सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहायक.
१९) निवडनस्ती नवि-४ कार्यासन, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.